राज्यातील शासकीय धान्य गोदामांमध्ये अन्नधान्याची पोती शिवण्यासाठी शिवण यंत्रे, हँगींग हुक व शिवण यंत्रासाठी लागणारा धागा खरेदीस प्रशासकीय मान्यता तसेच ई-निविदा काढण्याबाबत मार्गदर्शक सूचना...

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सामुग्री-३११६/ प्र.क्र. १७१ / ना.पु. १६ अ,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १५ जुलै, २०१७.

वाचा : (१) उद्योग उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-६, दि. ०१ डिसेंबर, २०१६
(२) शासन निर्णय क्र. सामुग्री-३११६/प्र.क्र.१७१/नापु-१६ अ, दि. १७ एप्रिल, २०१७

**प्रस्तावना :-**

शासकीय धान्य गोदामातील अन्नधान्याच्या पोत्यांचे प्रमाणिकरण करण्यासाठी सुतळीचा वापर करण्यात येतो. मात्र, मागील ३ वर्षात बाजारामध्ये सुतळीच्या वाढलेल्या किमती त्याचप्रमाणे अन्नधान्याच्या पोत्यांचे प्रमाणिकरण करण्याचा वेग वाढविण्याची निर्माण झालेली आवश्यकता विचारात घेता, मा.मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांच्या सुचनांनुसार राज्यातील शासकीय गोदामांमध्ये अन्नधान्याच्या पोत्यांचे प्रमाणिकरण केल्यानंतर ती शिवण्यासाठी सुतळी ऐवजी पोती शिवणयंत्रे वापरण्याच्या पर्यायाचा अभ्यास करण्यासाठी उप सचिव श्री. सतीश सुपे यांच्या अध्यक्षतेखाली समितीची स्थापना करण्यात आली होती. समितीने आपला अहवाल मा.मंत्री महोदयांना सादर केला. यामध्ये शिवणयंत्रे व त्यासाठी लागणारा धागा यांची किंमत एक वर्षासाठी लागणाऱ्या सुतळी गाठींच्या किंमतीपेक्षा खूपच कमी असल्याचे निदर्शनास आले. यामुळे शासनाच्या निधीची मोठ्या प्रमाणावर बचत होत असल्याने, टप्प्या टप्प्याने राज्यातील शासकीय गोदामांमध्ये अन्नधान्याची पोती शिवण्यासाठी पोती शिवणयंत्रे व धागा वापरण्याचा निर्णय घेण्यात आला. ही पोती शिवण यंत्रे विजेवर चालत असल्याने पहिल्या टप्प्यामध्ये वीज उपलब्ध असलेल्या शासकीय गोदामांमध्ये ती बसविण्याचे निश्चित करण्यात आले.

संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आलेल्या विभागीय भांडार खरेदी समितीच्या दि. २२ जून, २०१७ रोजी झालेल्या बैठकीत राज्यातील वीज उपलब्ध असलेल्या ५५० शासकीय गोदामांमध्ये पोती शिवणयंत्रे व त्याच्या सुट्या भागांचा संच, हँगींग हुक व शिवण यंत्रांसाठी लागणारा धागा खुल्या ई-निविदा प्रक्रियेद्वारे खरेदी करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

त्याअनुषंगाने राज्यातील शासकीय गोदामांमध्ये अन्नधान्याच्या पोत्यांचे प्रमाणिकरण केल्यानंतर ती शिवण्यासाठी पोती शिवण यंत्रे, हँगींग हुक व शिवण यंत्रासाठी लागणारा धागा यांची खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची, या खरेदीसाठी खुली ई-निविदा प्रक्रिया राबविण्यासाठी मार्गदर्शक सूचना देण्यासाठी शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्यातील शासकीय गोदामांमधील अन्नधान्याच्या पोत्यांचे प्रमाणिकरण केल्यानंतर ती शिवण्यासाठी सहज हाताळता येतील अशी पोती शिवणयंत्रे (Bag Closer Machines) व त्याच्या सुट्याभागांचा संच (Spare Parts), हँगींग हुक (Hanging Hook) व शिवण यंत्रांसाठी लागणाऱ्या धाग्याची (Polypropylene multi-filament thread) खरेदी करण्यास व त्यासाठी खुली ई-निविदा प्रक्रिया राबविण्यास शासनाची प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

बाजारात सुतळी गाठींच्या किंमतीमध्ये मोठ्या प्रमाणावर वाढ झाल्याने त्याचप्रमाणे सुतळी गाठी खरेदी निविदा प्रक्रियेमध्ये सुतळी गाठींचे दर चढे आल्याने सुतळी खरेदीसाठी प्रतिवर्ष रु. ११.०० कोटी इतका खर्च अभिप्रेत होता. त्यामुळे राज्यातील शासकीय गोदामांना गेल्या दोन वर्षापासून सुतळी गाठींचा पुरवठा करण्यात आलेला नाही. शिवणयंत्राच्या वापरामुळे या खर्चात मोठया प्रमाणात बचत होणार आहे. तसेच तिचा उपयोग तातडीने होणार आहे, ही बाब सदरच्या खरेदीची आवश्यकता अधोरेखित करते.

**पोती शिवणयंत्रे व त्याच्या सुट्याभागांचा संच, हँगींग हुक व पोती शिवण यंत्रांसाठी लागणारा धागा खरेदी करण्याची कार्यपद्धती पुढीलप्रमाणे विहित करण्यात येत आहे :-**

**(१) निविदा प्रक्रिया राबविण्याची जबाबदारी:-**

१.१ शासनाच्या वतीने राज्यातील वीज उपलब्ध असलेल्या ५५० शासकीय धान्य गोदामांमधील अन्नधान्याच्या पोत्यांचे प्रमाणिकरण झाल्यानंतर ती शिवण्यासाठी आवश्यक असणारी १) ११०० पोती शिवणयंत्रे व त्यांच्या सुट्याभागांचा संच (सुट्याभागांची नावे व आवश्यक संख्या याबाबतची माहिती परिशिष्ट अ मध्ये दिली आहे), २) ५५० हँगींग हुक व ३) शिवण यंत्रांसाठी लागणाऱ्या १००० मीटर धाग्याच्या १,६५,००० रिळांचा पुरवठा करण्यासाठीची स्वतंत्र खुली ई-निविदा प्रकिया राज्यस्तरावर संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई यांच्याकडून राबविण्यात येईल. ई-निविदेमध्ये मागविण्यात येणारा दर सर्व समावेशक (संबंधित जिल्ह्याच्या ठिकाणी पोहोच करण्यासाठी येणारा सर्व खर्च अधिक अनुषंगित कराचा समावेश करून) असेल.

१.२ खुल्या निविदांसाठी सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय क्रमांक मातंसं/नस्ती २०१२/ प्र.क्र.२७३/३९, दिनांक २६ नोव्हेंबर, २०१४ मधील सूचनांनुसार, त्याचप्रमाणे उद्योग उर्जा व

कामगार विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील दि. १ डिसेंबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार खुली ई-निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

१.३ संपूर्ण निविदा प्रक्रिया पूर्ण करणे व दर मंजूर झालेल्या पुरवठादाराशी विहित कालावधीत करारनामा करण्याची जबाबदारी संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई यांची राहील.

**(२) कंत्राट कालावधी :-**

२.१ पोती शिवणयंत्रे व त्याच्या सुट्याभागांचा संच व हँगींग हुक या ई-निविदा प्रक्रियेतील ज्या निविदाकारांचे दर स्विकारण्यात येतील त्या निविदाकारांनी करारनामा केल्यापासून ६० दिवसांच्या आत सर्व पोती शिवणयंत्रे व त्याच्या सुट्याभागांचा संच व हँगींग हुक याचा पुरवठा संबंधित जिल्हा पुरवठा कार्यालयांना करावा.

२.२ पोती शिवण यंत्रांसाठी लागणारा धागा पुरविण्यासाठीच्या निविदाकाराने करारनामा केल्यापासून ६० दिवसांच्या आत एकूण आवश्यकतेच्या किमान ५० टक्के धाग्याचा पुरवठा संबंधित जिल्हा पुरवठा कार्यालयाना करावा व उर्वरित ५० टक्के धाग्याचा पुरवठा करारनामा केल्याच्या दिनांकापासून पाच महिन्यानंतर पुढील ३० दिवसांत करावा. म्हणजेच सर्व जिल्हा पुरवठा कार्यालयांना धाग्याचा एकूण पुरवठा हा करारनामा केल्यापासून सहा महिन्यात पूर्ण करावयाचा आहे.

**(३) निविदा प्रसिद्ध करताना निविदेमध्ये नमूद करावयाच्या इतर आवश्यक अटी :-**

सदर शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या अटी निविदा प्रसिद्ध करताना निविदा सूचनेमध्ये नमूद कराव्यात. तसेच सदर अटींचा समावेश निविदाकाराबरोबर करावयाच्या करारनाम्यातही करावा.

**(४) खरेदी करावयाच्या वस्तूंची मानके (Specifications):**

पोती शिवणयंत्रे व त्यांच्या सुट्याभागांचा संच, हँगींग हुक व शिवण यंत्रांसाठी लागणारा धागा यासाठीची मानके **(Specifications)** या शासन निर्णयासोबतच्या **परिशिष्ट "अ"** मध्ये नमूद केली आहेत. या मानकांनुसार खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी

यशस्वी निविदाकारास संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई यांनी निर्धारित केलेल्या संख्येनुसार या वस्तुंचा पुरवठा संबंधित जिल्हा पुरवठा कार्यालयात/ स्वत:च्या खर्चाने परिच्छेद-२ मध्ये नमुद केलेल्या कालावधीत करावयाचा आहे.

**(५) निविदा निश्चितीचे अधिकार :-**

उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दि. १ डिसेंबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार दि. १७ एप्रिल, २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये विभागीय भांडार खरेदी समिती स्थापन

करण्यात आलेली आहे. प्राप्त झालेल्या निविदा अंतिम मंजूरीसाठी विभागीय भांडार खरेदीसमोर मान्यतेस्तव सादर करण्यात येतील. कोणत्याही टप्प्यावर निविदा स्विकारण्याचा किंवा नाकारण्याचा अंतिम अधिकार विभागीय भांडार खरेदी समितीचा राहील.

**(६) निविदाकाराचा अनुभव :-**

६.१ पोती शिवणयंत्रे व त्याच्या सुट्याभागांचा संच, हँगींग हुक व शिवण यंत्रांसाठी लागणाऱ्या धाग्याच्या निविदांसाठी निविदाकाराने मागील लगतच्या ३ वर्षात विविध उत्पादनाच्या एकूण निविदा किमतीच्या ५० टक्के इतक्या उत्पादनांची विक्री / पुरवठा केलेला असणे आवश्यक असेल. तसे सनदी लेखापालाचे प्रमाणपत्र **(परिशिष्ट-ब)** सादर करावे लागेल. त्याचप्रमाणे कामाच्या आदेशांच्या तसेच समाधानकारक पुरवठा केल्याच्या कागदपत्रांच्या प्रती सादर कराव्या लागतील.

६.२ उत्पादक कंपन्या किंवा उत्पादक कंपन्यांचे अधिकृत विक्रेते त्या कंपन्यांच्या वतीने निविदा प्रक्रियेमध्ये सहभागी होऊ शकतील. त्यासाठी त्यांना वितरक प्रमाणपत्र सादर करावे लागेल.

**(७) निविदा अर्ज शुल्क व इसाऱ्याची रक्कम :-**

७.१ निविदेच्या प्रकारानुसार निविदा अर्ज शुल्क व इसारा रक्कम पुढील प्रमाणे असेल -

(रुपये)

| अ.क्र. | निविदेचा प्रकार | खरेदीची (निविदेची) एकूण किंमत | निविदा अर्ज शुल्क | इसारा रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | पोती शिवण यंत्रे व त्यांच्या सुट्या भागांचा संच | १,१९,९०,०००/- | १२,०००/- | १,२५,०००/- |
| २ | हँगीग हूक | २७,८०,०००/- | ३,०००/- | ५०,०००/- |
| ३ | शिवण यंत्रासाठीचा धागा | १,१८,८०,०००/- | १२,०००/- | १,२५,०००/- |

७.२ इसाऱ्याची रक्कम ऑनलाईन पध्दतीने भरण्यात यावी.

७.३ ज्यांनी इसारा रक्कम भरलेली असेल, त्यांना निविदा भरणे बंधनकारक आहे, निविदा न भरल्यास त्यांची इसाऱ्याची संपूर्ण रक्कम जप्त करण्यात यावी.

७.४ विनिर्दिष्टीत केलेल्या इसारा रक्कमेपेक्षा कमी रक्कम भरणाऱ्या निविदाधारकाची निविदा अपात्र ठरवून भरलेली संपूर्ण रक्कम जप्त करण्यात यावी.

७.५ संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई यांनी इसारा रक्कम कोणाच्या नावे भरणा करावयाची याचा स्पष्ट उल्लेख निविदा सूचनेत करावा.

७.६ निविदा उघडल्यानंतर न्यूनतम निविदाकाराव्यतिरिक्त उर्वरित सर्व पात्र/अपात्र निविदाधारकांची इसारा रक्कम सात दिवसात परत करण्यात यावी .

७.७ इसारा रकमेवर कुठल्याही प्रकारे व्याज देय राहणार नाही.

७.८ इसारा रक्कम दोन महिन्याच्या आत परत न केल्यास झालेल्या विलंबावर १० टक्के व्याज प्रदेय राहिल व व्याजाची पूर्ण रक्कम विलंबास जबाबदार असणाऱ्या संबंधित अधिकारी / कर्मचारी यांचेकडून वसूल करण्यात यावी.

७.९ सुक्ष्म व लघु, मध्यम उद्योग अधिनियम-२००६ अंतर्गत उत्पादक म्हणून नोंदणीकृत असलेल्या ज्या सुक्ष्म व लघु उत्पादक उद्योगांना व मध्यवर्ती भांडार खरेदी संघटना यांचेकडे नोंदणी झालेल्या उत्पादक पुरवठादारांना निविदा शुल्क व इसारा रक्कम भरण्यापासून सुट देण्यात आलेली आहे, त्यांनी सुट दिल्याबाबतचे प्रमाणपत्र सादर करावे.

**(८) अनामत रक्कम** (Security Deposit):-

८.१ ज्या निविदाकाराची निविदा मंजूर केली आहे त्या निविदाकारास उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दि. १ डिसेंबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयासोबतच्या नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र.४.६ मधील तरतूदीनुसार आदेशाच्या (निविदेच्या) मुल्याच्या कमीत कमी ३% इतकी रक्कम अनामत म्हणून करारनाम्यासोबत धनाकर्षाद्वारे वित्तीय सल्लागार व उपसचिव यांचे नावे जमा करावी लागेल.

८.२ अनामत रकमेवर कोणतेही व्याज देय राहणार नाही. तसेच, पुरवठादाराने करारातील कोणत्याही अटीचा भंग केल्यास अनामत रक्कम जप्त करण्यात येईल व त्याचे नाव काळ्या यादीत टाकण्यात येईल.

**(९) निविदा पध्दती - द्वि लिफाफा पध्दती:-**

९.१ निविदा पध्दती ही सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक मातंसं/नस्ती /२०१२ प्र.क्र.२७३/३९, दिनांक २६नोव्हेंबर, २०१४ च्या शासन निर्णयानुसार ई-निविदा कार्यपद्धतीचा अवलंब करून राबविण्यात यावी.

९.२ ई-निविदेसाठी अनुसरावयाची कार्यपद्धती आणि मार्गदर्शक सूचना http://mahatenders.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध आहे. त्यानुसार कार्यवाही करण्यात यावी.

९.३ निविदेकरीता द्वी लीफाफा पद्धतीचा अवलंब करण्यात येईल. यामध्ये पहिला लिफाफा हा तांत्रिक लिफाफा असेल ज्यामध्ये निविदाकाराची पात्रता सिद्ध करणारे पुरावे व निविदेच्या अटी व शर्ती मान्य असल्याचे स्वाक्षरीत केलेले दस्तऐवज असतील. दुसरा लिफाफा हा दराविषयक लिफाफा असेल ज्यात निविदाकार आपले दर नमुद करेल.

९.४ शिवणयंत्र व त्याच्या सुट्याभागांचा संच निविदेमधील लिफाफा "ब" मध्ये निविदाकाराने परिशिष्ट "अ" मध्ये नमुद केलेल्या मानकाच्या अनुषंगाने दर नमुद करावा. (सुट्याभागांची नावे व संख्या विचारात घ्यावी).

९.५ हँगींग हुक निविदेमधील निविदाकाराने लिफाफा "ब" मध्ये परिशिष्ट "अ" मध्ये नमुद केल्यानुसारच्या मानकांच्या अनुषंगाने दर नमुद करावा.

९.६ शिवण यंत्रांसाठी लागणाऱ्या धाग्याच्या निविदेमधील निविदाकाराने लिफाफा "ब" मध्ये परिशिष्ट "अ" मध्ये नमुद केल्यानुसारच्या मानकाच्या अनुषंगाने १००० मीटर धाग्याच्या रिळांचा दर नमुद करावा.

९.७ निविदेमध्ये कोणतेही अटीयुक्त दर स्विकारण्यात येणार नाहीत.

९.८ निविदांना तीन आठवडे किंवा कामाचे किमान १५ दिवस यांपैकी जे जास्त असेल तेवढया दिवसांकरीता प्रसिद्धी देण्यात यावी.

९.९ तांत्रिक लिफाफा "अ" मध्ये पुढील कागदपत्रे सादर करावीत.

लिफाफा "अ" मध्ये (तांत्रिक लिफाफा) सादर करावयाच्या कागदपत्रांची सूची

| अ.क्र. | कागदपत्रांची सुची |
|---|---|
| १ | भागीदारी फर्म/ कंपनी/ व्यवसाय नोंदणी दाखला, नियमावली व भागीदारी पत्रक |
| २ | निविदाकाराने मागील लगतच्या ३ आर्थिक वर्षात विविध उत्पादनांच्या एकूण निविदा किंमतीच्या ५० टक्के इतक्या उत्पादनाची आर्थिक उलाढाल केल्याचे दर्शविणारे चार्टर्ड अकांऊटंटचे प्रमाण पत्र **(परिशिष्ट ब)** |
| ३ | शासन निर्णयातील सर्व तरतूदी, अटी व शर्ती मान्य असल्याबाबतचे व त्यास बांधील असल्याबाबतचे शपथपत्र. |
| ४ | निविदाकाराचा PAN क्रमांक अथवा TAN क्रमांक कागदपत्राची साक्षांकित प्रत |
| ५ | निविदाकाराचा GST नोंदणी क्रमांक (नोंदणी क्रमांक प्राप्त झालेला नसल्यास अर्ज केल्याबाबतचा पुरावा) |
| ६ | सक्षम प्राधिकाऱ्याचे दि ३१.मार्च,२०१ ७ पर्यंतचे व्हॅट क्लिअरंस सर्टीफिकेट, तसे सर्टीफिकेट प्राप्त झालेले नसल्यास अर्ज दाखल केल्याच्या पावतीची प्रत. |
| ७ | जर निविदाकार हा उत्पादक कंपनीचा अधिकृत वितरक असेल तर, विहित नमुन्यातील वितरक नियुक्तीचे प्रमाणपत्र |
| ८ | सुक्ष्म व लघु, मध्यम उद्योग अधिनियम २००६-अंतर्गत उत्पादक म्हणून नोंदणीकृत असलेल्या सुक्ष्म व लघु उत्पादक उद्योगांना व मध्यवर्ती भांडार खरेदी संघटना यांचेकडे नोंदणी झालेल्या उत्पादक पुरवठादारांना निविदा शुल्क व इसारा रक्कम भरण्यापासून, सुट देण्यात आलेली आहे, त्यांनी सुट दिल्याबाबतच्या प्रमाणपत्राची साक्षांकित प्रत . |
| ९ | शासन निर्णयातील सर्व तरतूदी, अटी व शर्तीना बांधील असेल अशा आशयाचे शपथपत्र रु. १००/- च्या स्टॅम्प पेपरवर विहित केलेल्या नमुन्यात **(परिशिष्ट-क)** |

९.१० तांत्रिक लिफाफा "अ" मधील कागदपत्रांची पूर्तता निविदा सादर करताना पूर्ण करण्यात यावी. तांत्रिक लिफाफा उघडल्यानंतर ऐनवेळी कागदपत्रे स्विकारण्यात येऊ नये. तांत्रिक लिफाफ्यातील कागदपत्रात व अटी/शर्तीत नमूद केलेल्या अर्हतेपेक्षा कमी अर्हता आढळल्यास निविदा अपात्र ठरविण्यात यावी.

९.११ शासनाला स्पर्धात्मक दर प्राप्त होण्यासाठी खऱ्याखुऱ्या निविदाकारांना जास्तीत जास्त संख्येने निविदांमध्ये सहभागी होण्याची संधी देणे आवश्यक आहे. हा दृष्टीकोन ठेऊन विहित केलेल्या अत्यावश्यक कागदपत्रांमध्ये काही किरकोळ स्वरुपाच्या त्रुटी असतील (उदा. शपथपत्रे, सांक्षांकित नसलेली कागदपत्रे इ.) व अशा त्रुटीची तात्काळ पूर्तता करणे शक्य असल्यास, व्यापारी लिफाफा उघडण्यापूर्वी अशा त्रुटीची तात्काळ पूर्तता करण्याची परवानगी निविदाकारांना द्यावी. अशा त्रुटी या वेळेत पूर्ण करता आल्या नाहीत तर मात्र ती निविदा अपात्र ठरवावी .

९.१२ तांत्रिक लिफाफा "अ" मध्ये पात्र ठरलेल्या निविदाकारांनी ते पुरवठा करु इच्छिणाऱ्या शिवणयंत्र, हँगींग हुक व शिवण यंत्रांसाठी लागणाऱ्या धाग्याचे रिळ नमुना म्हणून गुणनियंत्रणासाठी संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय यांना उपलब्ध करुन द्यावा. सदरचे नमुने संचालक, नागरी पुरवठा यांनी उद्योग ऊर्जा व कामागार विभागाच्या शासन निर्णय दि. १ डिसेंबर, २०१६ सोबतच्या परिशिष्ट क्रमांक १२ मध्ये दिलेल्या त्रयस्थ संस्थेकडे मालाच्या दर्जाविषयक तपासणीसाठी पाठवावेत. या संस्थेकडून प्राप्त अहवालामध्ये पात्र ठरलेल्या निविदाकारांचा दरांचा लिफाफा "ब" उघडण्यात यावा.

९.१३ निविदा प्रक्रियेदरम्यान तांत्रिक लिफाफा "अ" उघडल्यानंतर व्यापारी दराचा लिफाफा "ब" उघडण्यापूर्वी कोणत्याही निविदाधारकांचे तात्रिक लिफाफ्यासंदर्भात कोणतेही आक्षेप असल्यास अशा निविदाधारकांकडून आक्षेप लेखी घ्यावेत, कोणत्याही परिस्थितीत तोंडी आक्षेप मान्य करण्यात येवू नयेत.

९.१४ निविदाधारकांकडून लिफाफा "अ" म्हणजे तांत्रिक लिफाफयात आवश्यक असलेली कागदपत्रे सादर न केल्यास सदरची निविदा अपात्र ठरविण्यात यावी. अशा निविदेचा लिफाफा "ब" उघडण्यास अपात्र ठरत असल्याने, संबंधित निविदाधारकाची लिफाफा "ब" उघडण्याची व त्यातील दर विचारात घेण्याची लेखी किंवा तोंडी आग्रह / विनंती कोणत्याही परिस्थितीत ग्राह्य धरण्यात येवू नये.

९.१५ निविदा प्रक्रियेदरम्यान तांत्रिक लिफाफा "अ "उघडल्यानंतर निविदाधारकांचे तात्रिक लिफाफा संदर्भात कोणतेही आक्षेप नसल्यास सर्व पात्र व अपात्र निविदाधारकांकडून आक्षेप नसल्याबाबत तसे लेखी घ्यावे. आक्षेपाचे निराकरण करुन दराचा लिफाफा उघडण्यात यावा.

९.१६ निविदा अथवा निविदेमध्ये कोणतीही अट अथवा पर्याय निविदाधारकास देता येणार नाही. अशा अटीयुक्त निविदा अपात्र ठरविण्यात याव्यात.

९.१७ निविदा कालावधीच्या अंतिम दिनांकापर्यंत ३ पेक्षा कमी निविदाकार सहभागी झाल्याचे दिसून आल्यास निविदा प्रक्रियेस किमान ०७ दिवसांची पहिली मुदतवाढ देण्यात यावी. यावेळीही ३ पेक्षा कमी निविदा प्राप्त झाल्यास, निविदा सादर करण्यास पुन्हा ०७ दिवसांची दुसरी मुदतवाढ देण्यात यावी. प्रथम निविदेअंती किंवा मुदतवाढीनंतरही तांत्रिकदृष्ट्या ३ पेक्षा कमी पात्र निविदा प्राप्त झाल्यास फेरनिविदा मागविण्यात यावी.

९.१८ दोन्ही मुदतवाढीनंतर तीन किंवा त्यापेक्षा अधिक निविदा प्राप्त झाल्यास लिफाफा अ व त्यात पात्र ठरलेल्या निविदाकारांचा लिफाफा ब उघडण्याची कार्यवाही निविदा मागविणाऱ्या अधिकाऱ्याने करावी .

९.१९ दोन मुदतवाढीनंतरही निविदा प्राप्त झाल्यास १पेक्षा कमी मात्र किमान ३, निविदा उघडणाऱ्या अधिकाऱ्याने म्हणजे संचालक, नागरी पुरवठा, मुंबई यांनी त्यांच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांसमोर (प्रशासकीय विभाग) "दराचा" लिफाफा "ब" उघडावा व त्यावर वरिष्ठ अधिकाऱ्यांची स्वाक्षरी घेऊन स्वतंत्रपणे निर्णय घ्यावा.

९.२० निविदाधारकाने शासन निर्णयातील सर्व तरतूदी लक्षात घेवून निविदेत दर नमूद करावेत. मागाहून दरातील बदलाबाबतची विनंती अथवा कोणत्याही प्रकाराच्या तक्रारीची दखल घेण्यात येणार नाही.

**(१०) निविदेतील दराची विधीग्राह्यता:-**

निविदा उघडल्यानंतर दराबाबतचा कोणताही बदल स्विकारण्यात येऊ नये. सर्व निविदाकारांची दरपत्रके निविदा उघडण्याच्या तारखेपासून १२० दिवस विधीग्राह्य राहतील. मात्र या कालावधीमधून निविदा प्रक्रियेबाबत न्यायालयीन प्रकरण उद्भवल्यास त्यासाठी लागणारा कालावधी वगळण्यात येईल.

**(११) वाटाघाटी करण्याबाबत :-**

एल-१ व्यतिरिक्त अन्य कोणाशीही वाटाघाटी करण्यात येणार नाहीत. एल-१ सोबत करण्यात येणाऱ्या वाटाघाटी देखील उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दि. १ डिसेंबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयातील परि.४.४.४.१ मधील तरतूदीनुसार करण्यात येतील.

**(१२) निविदाकाराने करारनामा न केल्यास:-**

१२.१ मंजूर निविदाकारास निविदा मंजूरीनंतर ७ दिवसाचे आत सर्व कागदपत्रांची पूर्तता करुन रुपये १००/- च्या स्टँम्प पेपरवर विहित नमुन्यात करारनामा करणे बंधनकारक आहे.

१२.२ प्रथम न्यूनतम निविदाकार करारनामा करण्यास असमर्थ ठरल्यास निविदाप्रक्रिया रद्द करुन फेरनिविदा बोलाविण्यात येतील. अशा फेरनिविदा प्रक्रियेत पहिल्या निविदेत करारनामा करण्यास नकार देणाऱ्या निविदाकारांना प्रतिबंधित करण्यात येईल.

१२.३ निविदा सादर केल्यानंतर निविदाकार हा निविदेच्या तसेच करारनाम्यातील तरतूदींना बांधील राहिल. न्यूनतम दर असलेल्या निविदाकाराने करारनामा करण्यास नकार दिल्यास अथवा टाळाटाळ केल्यामूळे अथवा आदेश देवूनही काम न केल्यामूळे, अथवा फेर निविदा मागवून मंजूर केल्यामूळे, शासनाने खर्च करावयाची अतिरिक्त रक्कम, स्टेट बँक ऑफ इंडियाच्या **"पी. एल. आर. (Prime Lending Rate) अधिक दोन टक्के"** व्याजासह करारनामा न केलेल्या निविदाकाराकडून वसूल करावी.

**(१३) करारनाम्यास मंजूरी:-**

१३.१ शासनाच्या वतीने निविदाकारासोबत करारनामा करण्यासाठी संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

१३.२ या शासन निर्णयानुसार खुली ई-निविदा प्रक्रिया राबवून निविदा मंजूर करण्यात आलेल्या निविदाकारासोबत करण्यात येणाऱ्या करारनाम्यास या शासन निर्णयातील सर्व तरतूदी लागू राहतील. तसे करारनाम्यात नमूद करण्यात यावे.

१३.३ करारनाम्यावर संचालक / उप संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई व कंत्राटदार यांनी स्वाक्षरी करणे आवश्यक राहील.

१३.४ करारनाम्याच्या प्रत्येक पानावर व दुरुस्तीच्या ठिकाणी संचालक / उप संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई व कंत्राटदार यांनी स्वाक्षरी करणे आवश्यक राहील.

**(१४) कंत्राटदाराची जबाबदारी:-**

१४.१ पोती शिवणयंत्रे व त्यांच्या सुट्या भागांचा संच या प्रकारच्या निविदेतील यशस्वी निविदाकारास शिवण यंत्रासाठी ३ महिन्याची वॉरंटी बंधन कारक असून उपरोक्त कालावधीत मशिनची देखभाल दुरुस्ती करणे त्यांच्यावर बंधनकारक आहे.

१४.२ पोती शिवणयंत्र, हँगींग हुक व शिवण यंत्रांसाठी लागणाऱ्या धाग्याचे रिळ वाहतूकीदरम्यान खराब (Damage) झाल्यास त्यास कंत्राटदार स्वत: जबाबदार राहील. सदरच्या वस्तु बदलून न दिल्यास त्याची रक्कम कंत्राटदारास द्यावयाच्या देयकातून कपात करुन घेण्यात येईल.

१४.३ परिशिष्ट "अ" मध्ये दर्शविलेल्या मानकांप्रमाणे (Specifications) शिवणयंत्रासोबत त्याचे सुटेभाग (विहित केलेल्या संख्येनुसार) त्याचप्रमाणे इतर आवश्यक साहित्य (Standard accessories) देणे बंधनकारक आहे.

१४.४ यशस्वी निविदाकारास परिच्छेद २ मध्ये नमुद केल्यानूसार वस्तूंचा पुरवठा करणे बंधनकारक असेल.

१४.५ जिल्हा पुरवठा कार्यालयाच्या ठिकाणी शिवणयंत्राचा पुरवठा केल्यानंतर संबंधित निविदाकाराने जिल्ह्याच्या ठिकाणी शिवणयंत्राचे प्रात्याक्षिक आयोजित करणे बंधनकारक राहिल. यामध्ये शिवणयंत्राची देखभाल दुरुस्ती, छोटे मोठे दोष निवारण, काही कालावधीनंतर जे सुटे भाग बदलावे लागतात, ते बदलण्याचे प्रात्याक्षिक इ. माहिती शिवणयंत्रे वापरणाऱ्या हमाल कामगारांना देण्यात यावी.

१४.६ कंत्राटदारास उपकंत्राटदाराची नियुक्ती करता येणार नाही.

**(१५) निविदा स्विकृती / अस्विकृती:-**

संपूर्ण निविदा अथवा निविदेचा काही भाग कोणतेही कारण न देता स्विकृत अथवा अस्विकृत करण्याचा अधिकार विभागीय भांडार खरेदी समितीकडे राहिल.

**(१६)** कंत्राटदाराकडून डिलीव्हरी घेताना संबंधित गोदामपाल / गोदाम व्यवस्थापक यांनी उत्पादकाचे चिन्हांकन, उत्पादन दिनांक, दर्जा (धाग्याच्या बाबतीत १००० मीटरचे रिळ असल्याचे) योग्य असल्याबाबत खातरजमा करावी. त्यासाठी डिलीव्हरी घेताना प्राप्त झालेल्या वस्तू जिल्हा पुरवठा अधिकारी/ सहाय्यक जिल्हा पुरवठा अधिकारी/ अन्नधान्य वितरण अधिकारी यांच्या समक्ष काढून घेऊन त्याची तपासणी करावी.

**(१७)** कंत्राटदाराने डिलीव्हरी दिल्यानंतर, डिलीव्हरी चलनावर शिवणयंत्र व त्याच्या सुट्याभागांचा संच, हँगींग हुक, शिवण यंत्रांसाठी लागणाऱ्या धागा (रिळ) ताब्यात घेणाऱ्या गोदामपाल/ गोदाम व्यवस्थापक यांच्या सही शिक्क्यानंतर डिलीव्हरी चलनावर जिल्हा पुरवठा अधिकारी/ सहाय्यक जिल्हा पुरवठा अधिकारी/ अन्नधान्य वितरण अधिकारी यांनी प्रती स्वाक्षरी करुन शिक्का मारावा ( निविदा वेगवेगळया असल्याने प्रत्येक प्रकारासाठी (वस्तूसाठी) वेगळे चलन तयार करावे). शिवण यंत्रांसाठी लागणाऱ्या धाग्याचा दर्जा तपासून (धाग्याचे रिळ १००० मीटरचे असल्याचे) **परिशिष्ट-ड** मध्ये विहित केल्यानूसार प्रमाणपत्र द्यावे.

जिल्हा पुरवठा अधिकारी / अन्नधान्य वितरण अधिकारी यांचेकडून प्राप्त झालेले प्रमाणपत्र व देयकाची तपासणी करुन पुरवठा आयुक्तांचे कार्यालयाने मुळ देयकांच्या मागे प्रदानार्थ आदेश द्यावा व संचालक, नागरी पुरवठा यांनी सदर देयके अंतिम प्रदानार्थ वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांच्याकडे सादर करावीत. त्यानुसार वित्तीय सल्लागार व उप सचिव, अनापुवग्रासंवि यांनी देयके ३० दिवसात अदा करावीत.

**(१८) पुरवठ्यास विलंब झाल्यास करावयाची कार्यवाही :-**

१८.१ विलंब शुल्काच्या आकारणीबाबत भांडार खरेदी नियमावलीच्या दिनांक १ डिसेंबर, २०१६ च्या शासन निर्णयातील परिशिष्ट-४(अ) मध्ये दर्शविल्यानुसार मालाची किंमत रु. २ लाखापेक्षा जास्त

नसल्यास प्रती हप्ता विलंबास ½ टक्के विलंब शुल्क व कमाल मर्यादा १० टक्क्यांच्या मर्यादेत विलंब शुल्काची आकारणी करण्याची तरतूद आहे. तसेच मालाची किंमत रु. २ लाखापेक्षा जास्त असल्यास प्रती हप्ता विलंबास ½ टक्के विलंब शुल्क व कमाल मर्यादा ५ टक्क्यांच्या मर्यादेत विलंब शुल्काची आकारणी करण्याची तरतूद आहे. पुरवठयास विलंब झाल्यास सदर तरतूदीनुसार कंत्राटदाराच्या देयकातून विलंब शुल्क वसूल करण्यात येईल.

१८.२ शिवण यंत्रांसाठी लागणारा धागा (Polypropylene multi-filament thread) पुरवठादाराने विहित मुदतीत पुरवठा न केल्यामुळे स्थानिकरित्या खरेदी करावी लागल्यास किंमतीतील तफावतीची रक्कम पुरवठादाराच्या देयकातून वसूल करण्यात येईल.

**(१९) करारनाम्यातील तरतूदीसंदर्भात वाद विवाद व अपिलः-**

करारनाम्यातील तरततूदीसंदर्भात तसेच दंड, वसूली इ. संदर्भात संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई यांनी दिलेल्या निर्णयाविरुध्द, निर्णय दिल्याच्या दिनांकापासून ३० दिवसात कंत्राटदार शासनाकडे कडे दाद मागू शकेल. शासनाने दिलेला निर्णय अंतिम राहील आणि तो दोन्ही पक्षांना बंधनकारक राहील. कंत्राटदार करारनामा संपल्यानंतर जास्तीत जास्त ६ महिन्यात करारनाम्यातील तरतूदीसंदर्भात दाद मागू शकेल.

**(२०)** पोती शिवणयंत्र चालविण्यासाठी २T किंवा SEA१० या प्रकारचे वंगण तेल लागणार असून सदरचे तेल हे आवश्यकतेनुसार जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या स्थानिक निधीतून खरेदी करावे.

**(२१)** या कामी येणारा खर्च हा अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या वित्तीय सल्लागार व उप सचिव, महाराष्ट्र शासन यांचे वैयक्तिक ठेव लेख्यामधून मागणी क्रमांक एम-४, "४४०८ अन्न साठवणूक व वखार साठवणूक व वखार साठवण यावरील भांडवली खर्च, मुख्य लेखाशिर्ष (०२)(१०) राष्ट्रीय अन्न सुरक्षा योजनेखालील मुंबई शहर अन्नधान्य खरेदीवरील अनुषंगिक खर्च (अनिवार्य), ४४०८ ०३२६, या लेखाशिर्षा खाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०१७-२०१८ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**(२२)** सदर शासन निर्णय अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या शासन निर्णय क्र.रवका-१०९८/५६७/प्र.क्र.२३३८/नापु-१२, दि.३० नोव्हेंबर, १९९८, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग-२, उपविभाग-४, अ.क्र.१५ व २७ प्रमाणे प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

**(२३)** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१७०७१५१७२८५९२५०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Satish Shridhar Supe

Digitally signed by Satish Shridhar Supe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplies And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f7773ccec10687b16ba0f2d3f7f9e6f87fe68f9b1b2cb5b73b75bab952ca0621, cn=Satish Shridhar Supe
Date: 2017.07.15 17:27:50 +05'30'

**( सतिश श्रीधर सुपे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
२) मा.राज्य मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
३) मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५) विकास आयुक्त(उद्योग), उद्योग संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
६) सर्व विभागीय आयुक्त,
७) नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.
८) संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई
९) सर्व उपायुक्त (पुरवठा), विभागीय आयुक्त, कार्यालय
१०) सर्व जिल्हाधिकारी (मुंबई व मुंबई उपनगर जिल्हा वगळून)
११) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
१२) उपसंचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई.
१३) उप संचालक, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई.
१४) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
१५) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
१६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
१७) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
१८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, नागरी पुरवठा, लेखा परीक्षा परिमंडळ द्वारा: वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
२०) वित्त विभाग ( व्यय ४), मंत्रालय, मुंबई.
२१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई.
२२) निवड नस्ती/नापु-१६अ.

-------

(अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक : सामुग्री-३११६/प्र.क्र. १७१/ना.पु.१६अ, दिनांक : १५ जुलै, २०१७ सोबतचे सहपत्र)

(पोती शिवणयंत्रे (Bag Closer Machines) व त्याच्या सुट्या भागांचा संच (Spare Parts) (यादी व संख्या), हँगींग हुक (Hanging Hook) व शिवण यंत्रांसाठी लागणाऱ्या धाग्याची (Polypropylene multi-filament thread) च्या मानकांचे विवरणपत्र)

## परिशिष्ट- अ

**(१) शिवणयंत्रांसाठीची मानके (specifications of bag closing machine) व आवश्यक सुट्या भागाची यादी व संख्या:**

- Sewing Speed: Minimum 1600-1800 stiches per minute (5-8 bags per minute)
    - ✓ Stich Length: 6-8 mm
    - ✓ Single needle, single thread chain stitch sewing machine.
- Operating Materials:
    - ✓ Must sew 10 mm and thicker materials (all kinds of multi-wall papers, burlap, cotton, PP/PE, woven polyester, jute etc.).
    - ✓ All stiches must be tight, leak free (grains), uniformly spaced, no skip stitching and no unusual thread breaking.
- Power Requirements: 220V, single phase. AC/DC Motor of min. 1/10 HP
- Net weight of machines: not more than 7.0 kg.
- Dust proof sealed cover on machine. It is expected that machine must be sturdy and suitable for continuous operation without overheating. It is expected that parts of machine must be manufactured from wear resistance material. Common sewing machine parts such as bush needle bar, bush pressure bar, needle plate/throat plate, pressure bar, bushing looper shaft, looper, main shaft, etc. must be manufactured from mild steel or other high grade material with good hardness value.
- Holding handle of suitable material for firm grip and comfort while operating machine.
- Oil/greasing holes for lubrication of moving functional parts and to prevent wear of parts.
- In addition to standard spare parts and accessories, following items (with stated

quantities) must be supplied with each machine. The unit price of each item must be clearly and separately stated with the quoted machine price:

| Spare part item | Required quantities to be supplied with each |
|---|---|
| a. Motor carbon with | 12 pieces |
| b. Throat plates | 2 pieces |
| c. Needle lock nuts | 6 pieces |
| d. Needle bar with २ | 1 piece |
| e. Motor carbon holder cap | 5 pieces |
| f. Belts | 4 pieces |
| g. Needles | 20 Pieces |
| h. Looper | 8 pieces |

- Maintenance and Service Conditions: Warranty of minimum 90 days for any manufacturing defect. All details such as annual maintenance cost, parts covered under warranty period and other terms of contract must be clearly mentioned.
- Availability of spare parts and expertise for repair/maintenance at local/taluka level.
- Operating threads: Cotton and synthetic threads in the range of 500-1400 Twin Denier.
- Mechanical type of cutter to cut threads after closure of bags.
- Machine surface must be smooth and free from defects. Paint shall not be peeled easily from machine surface. No signs of overheating, breakage and manufacturing defects should be observed after continuous usage of machine (as per BIS standards). Machine should run smoothly without any abnormal/fatigues sound.
- Maximum dimensions of machine : 22” x 18” x 18”
- Standard accessories (Minimum these many parts must be supplied as a standard accessories):

  1. Accessories box, 2. Allen keys, 3. Needles (minimum 3 needles), 4. Wrench, 5. Screw driver, 6. Oil can, 7. Looper

(२) **हँगींग हुकची मानके (Specifications of Spring loaded Suspention unit (Hook)) :**

Suspension units are required to hold portable bag closure machines. The brief characteristics of suspension units are as follows:

- Must hold portable bag closure machines of minimum 7 kg weight. There must be two hooks with a locking system; one hook to hang the unit on bar and other hook to hold a portable bag closure machine at the end of rope of suspension unit

- Suspension unit must have a metallic rope of minimum 5 mm diameter and a length more than 4 feet.
- Rope must be spring loaded with a self re-winding arrangement with a provision to control rope length

(३) शिवण यंत्रांसाठी लागणाऱ्या धाग्याची (Polypropylene multi-filament thread) मानके :

| | |
|---|---|
| Material | Polypropylene (multi-filament thread) |
| Construction | 210/3x2 |
| Twin Denier | 1250 (±5%) gms |
| Breaking strength | 7 (-5%) kg |
| % Elongation | Less than 30% |
| Tenacity | 5.5 (-5% variation) |
| Twist per meter | 250/200 |
| Weight of cones | 150 to 160 gms (Y cones of 1000 meter length threads) |
| Length of thread in each cone | 1000 meters |
| Colour | Dual Colour |
| Compatible for working on portable bag closing machine and suitable for stitching of PP HDPE, jute and paper bags. | |

(अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक : सामुग्री-३११६/प्र.क्र. १७१ /ना.पु.१६अ, दिनांक : १५ जुलै २०१७ सोबतचे सहपत्र)

# परिशिष्ट- ब

TO WHOM IT MAY CONCERN

ON the basis of examination of the books of account and other relevant records of i.e. M/s.------------------------------ We hereby certify that the turnover the company / Distributor for the last three financial years are as follows :

| Period | Rs. in Laks |
|---|---|
| **2014-15** | |
| **2015-16** | |
| **2016-17** | |
| Total | |

(Name and Signature of Chartered Accountant)

(अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक : सामुग्री-३११६/प्र.क्र. १७१ /ना.पु.१६अ, दिनांक : १५ जुलै, २०१७ सोबतचे सहपत्र)

# परिशिष्ट- क

## AFFIDAVIT

**(For acceptance of terms and conditions of GR)**

(To be submitted on Rs.100/- Stamp paper)

I, __________ (Name) owner of _____________(Name of company) aged ___, __________________ (Regd Address of company), do hereby solemnly affirm and declare as under:

I accept all terms and conditions as prescribed in Food, Civil Supplies and Consumer Protection Department of Maharashtra GR NoSAMUGRI 3116/CR 171/NAPU-16 A dt. ............ and GR No. Bhakasa-2014/C.N.-82/Udyog-4, dated 01/12/2016 for supply of bag closer machines and Spare parts / Hanging hook /P.M.Thread.

I hereby state that whatever is stated herein above are true to the best of my knowledge.

On this ____ day of ______ 2017 (Signature of the Bidder)

Deponent

(अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक : सामुग्री-३११६/प्र.क्र. १७१ /ना.पु.१६अ
दिनांक : १५ जुलै, २०१७ सोबतचे सहपत्र)

# परिशिष्ट- ड

(शासन निर्णयातील परि १७ नुसार द्यावयाचे प्रमाणपत्र)

प्रति,

संचालक, नागरी पुरवठा,
पुरवठा आयुक्तांचे कार्यालय,
मुंबई - ४०० ०२१.

विषय :- शिवणयंत्रे, सुटे भाग / हॅंगींग हुक/पी.एम. थ्रेड **जिल्ह्यासाठी प्राप्त झाल्याबाबतचे प्रमाणपत्र देणेबाबत.**

संदर्भ :- शासन निर्णय क्र. सामुग्री-३११६/प्र.क्र. १७१ /ना.पु.१६अ
दिनांक, जुलै, २०१७

महोदय,

प्रमाणित करण्यात येते की, मेसर्स -------------------------------- यांचेकडून या कार्यालयास दिनांक ------ रोजी ------ इतकी पोती शिवण यंत्रे व विहित सुटे भाग /------ हॅंगींग हुक / प्रति रीळ १००० मीटर याप्रमाणे --------- इतके रीळ (पी. एम थ्रेड) सुस्थितीत प्राप्त झाले आहेत. नोंद घेण्याची दक्षता घेण्यात येत आहे. ही शिवणयंत्रे वापरण्याचे पूर्ण प्रशिक्षण प्रात्यक्षिकासह देण्यात आलेले आहे. शिवणयंत्रामध्ये वारंवार होणाऱ्या दोषांची माहिती व आवश्यक सुटे भाग बदलण्याचे प्रशिक्षण देखील पुरवठादाराकडून देण्यात आलेले आहे. करीता प्रमाणपत्र देण्यात येत आहे.

दिनांक

स्वाक्षरी/-
जिल्हा पुरवठा अधिकारी / अन्नधान्य वितरण अधिकारी

गोल शिक्का